ज्ञानोबा तुकाराम पुरस्कार वितरण समारंभ आयोजन खर्चास वित्तीय मान्यता देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. ज्ञातुपु १४२३/प्र.क्र.४०५/सां.का.४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०७ मार्च, २०२४

**वाचा :** संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांचे पत्र क्र.सां.का.स/२५०५, दि. २४ एप्रिल, २०२३

**प्रस्तावना:-**

सन २०१९-२०, २०२०-२१, २०२१-२२ व २०२२-२३ या वर्षीचा ज्ञानोबा तुकाराम पुरस्कार अनुक्रमे ह.भ.प.बद्रीनाथ तनपुरे महाराज, ह.भ.प. बाबा महाराज सातारकर, स्वामी श्री.गोविंददेव गिरी, मा.बाभूळगांवकर शास्त्री महाराज यांना जाहिर करण्यात आला. सदर पुरस्कार वितरण सोहळा आयोजन खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१९-२०, २०२०-२१, २०२१-२२ व २०२२-२३ या वर्षीच्या ज्ञानोबा तुकाराम पुरस्कार वितरण सोहळ्याचा आयोजन खर्च रुपये ७७,३८,०००/- ( रुपये सत्त्याहत्तर लाख अडतीस हजार फक्त ) इतक्या खर्चास या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा खर्च मागणी क्र. झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना, (०४) इतर महोत्सव, (०४) (०१) इतर महोत्सव (२२०५ १६०५) ५० इतर खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०३०७११०६२९६४२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANIROODHA SURYAKANT DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2024.03.07 12:01:03 +05'30'

**(अनिरुध्द सु. देशपांडे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव (सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३. उप सचिव (सां.का.४) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, पहिला मजला, एम. जी. रोड, मुंबई ४०० ०३२
५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. महालेखापाल (लेखापरीक्षा) - १, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
९. महालेखापाल (लेखापरीक्षा) - २, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२. निवड नस्ती, सां.का.४